







**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग,**

मंत्रालय, २ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०००३२

क्रमांक : संकीर्ण ०४२४/प्र.क्र.१०/ अर्थ-२ दिनांक : ३० एप्रिल, २०२४.

**संदर्भ** :- १) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२००४/ प्र.क्र.१५/०४/२०१२, दिनोक २५.०५.२००६

२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीओडी-१००७/ प्र.क्र./१८,(र.व.का.), दिनांक १४.११.२०१३

**कार्यालयीन आदेश**

संदर्भाधीन शासन अधिसुचनेद्वारे महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनिमयन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ प्रसारित करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे या अधिनियमातील प्रकरण ३ करीता शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम, २०१३ तयार करण्यात आले असून ते दिनांक १४.११.२०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्यात लागू करण्यात आले आहेत.

तसेच विभागाशी / कार्यालयाशी संबंधीत सर्व बाबीवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारीत करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने गृह विभागातील अर्थ-२ या कार्यासनाशी संबंधीत विषयाबाबतीत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे तीन स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्याचे निर्देश असल्यास किंवा काही अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

प्रस्तूत शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०४३०१५२२१७७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANOJ DATTATRAY JADHAV

Digitally signed by MANOJ DATTATRAY JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2766AFDA86350272237DCF9A191545970F7F12E66D0605C664CA2BF0F3001DC0, cn=MANOJ DATTATRAY JADHAV
Date: 2024.04.30 15:34:56 +05'30'

**( मनोज जाधव )**

**उप सचिव, गृह विभाग.**

**प्रति,**

१) मा.उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२

२) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

३) प्रधान सचिव (अ. व सू.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

४) सह सचिव (आस्था-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
५) उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) निवड नस्ती, अर्थ-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

## विवरणपत्र

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनिमयन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ९ अंतर्गत गृह विभागातील अर्थ-२ कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्याबाबत अधिकाऱ्यांचे तीन स्तर खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत :-

| **अ. क्र.** | **कार्यासनाकडून हाताळला जाणारा विषय/कामकाज** | **सादरीकरणाचे ३ स्तर** | | | **आदेश निर्गमित करण्यास सक्षम प्राधिकारी** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| १ | विनियोजन लेखे अहवाल ). | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव / सह सचिव | अपर मुख्य सचिव | कक्ष अधिकारी / अवर सचिव |
| २ | कार्यक्रम अंदाजपत्रक तयार करणे. | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव / सह सचिव | अपर मुख्य सचिव | कक्ष अधिकारी / अवर सचिव |
| ३ | राज्य वित्त व्यवस्थेवरील अहवाल | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव / सह सचिव | ---- | कक्ष अधिकारी / अवर सचिव |
| ४ | महसुली जमा अहवाल | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव / सह सचिव | अपर मुख्य सचिव | कक्ष अधिकारी / अवर सचिव |
| ५ | सामान्य आणि सामाजिक क्षेत्र अहवाल | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव / सह सचिव | अपर मुख्य सचिव | कक्ष अधिकारी / अवर सचिव |
| ६ | लोकलेखा समितीच्या शिफारशींवर कार्यवाही करणे. | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव / सह सचिव | ---- | कक्ष अधिकारी / अवर सचिव |

********